**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग

शासन निर्णय- क्रमांक-प्रानिमं-३००२/४४२/प्र.क्र.३०/२००२/१३-अ

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक -६ ऑगस्ट, २००३.

**संदर्भ**:-१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-प्रानिमं-३०९९/५५५/ प्र.क्र.६९/९९/१३-अ, दिनांक- ११ जून १९९९,

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-प्रानिमं-३०९९/५५५/ प्र.क्र.६९/९९/१३-अ, दिनांक- १५ जून १९९९,

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-प्रानिमं-३०००/ प्र.क्र.१०/२०००/१३-अ, दिनांक- ०९मे २०००,

४) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-प्रानिमं-३०००/ प्र.क्र.३८/२०००/१३-अ, दिनांक- ३० ऑगस्ट,२०००.

**शासन निर्णयः-**

संदर्भाधीन क्रमांक (१) च्या शासन निर्णयानुसार महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई तसेच ६ प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळे बरखास्त करण्यात आलेली आहेत. निवड मंडळांच्या कक्षेतील जिल्हा स्तरीय गट-क ची पदे जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या जिल्हा निवड समितीमार्फत भरण्याचे आदेश देण्यात आलेले आहेत. गट क ची प्रादेशिक व राज्यस्तरीय पदे भरण्याबाबत संदर्भाधीन क्र. (३) च्या आदेशान्वये भूतपूर्व निवड मंडळानी त्यांच्याकडील प्रलंबित निवड प्रक्रियेचे कामकाज दि. ३१ मे २००० पर्यन्त निवड समित्यांकडे हस्तांतरीत करावे व सदर समित्यांनी ते पुढील ३ महिन्यांत पूर्ण करावे असे आदेश देण्यात आले आहेत. भूतपूर्व निवड मंडळांकडून शिफारस केलेल्या उमेदवारांना विहित कालमर्यादेत नियुक्ती बाबत संदर्भाधीन क्र. (४) च्या परिपत्रकाद्वारे आदेश देण्यात आले आहेत.

२. शासनाच्या सध्याच्या काटकसरीच्या धोरणास अनुसरुन भरतीवर निर्बंध आहेत. बदलत्या धोरणानुसार विविध विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील काही कार्यालये बंद झाल्यामुळे अनेक पदे रद्द झालेली आहेत व आढाव्याअंती अनेक कर्मचारी अतिरिक्त ठरलेले आहेत. तसेच अनेक विभागांमध्ये पदांच्या आढाव्याची कार्यवाही सुरु आहे . त्यामुळे अतिरिक्त ठरलेल्या कर्मचा-यांच्या व यापुढे अतिरिक्त ठरणा-या कर्मचा-यांच्या सेवेबाबतचा प्रश्न निर्माण झाला आहे.

३. सिव्हील अपील क्र.८५८/१९९७, एसएलपी २५१७/१९९७ या प्रकरणी सर्वोच्च न्यायालयाने असा निर्णय दिला आहे की," एखाद्या संवर्गात नेमणूका देण्यासाठी संपूर्ण कार्यवाही पूर्ण झाली असली तरीही दरम्यानच्या काळात शासनाचे धोरण बदलल्यास व बदलत्या परिस्थितीत सदरहू शिफारस केलेल्या उमेदवारांना नेमणूका देणे शक्य नसल्यास अशा उमेदवारांना नेमणूका देणे शासनावर बंधनकारक नाही." उपरोक्त परिस्थितीत भूतपूर्व निवड मंडळांकडे प्रलंबित असलेली निवड प्रक्रियेची कामे पूर्णत्वास नेऊन देखील शासनाच्या विद्यमान काटकसरीच्या धोरणानुसार भूतपूर्व निवड मंडळाने शिफारस केलेल्या उमेदवारांना नेमणूका देणे शासनास शक्य होणार नाही.

कृ.मा.प.

४. सबब याबाबत शासन असे आदेश देत आहे की, महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई व इतर ६ प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळे यांनी सुरु केलेली व अद्यापि प्रलंबित असलेली निवड प्रक्रिया, आहे त्या स्तरावर रद्द करण्यात यावी. सदर शासन निर्णयाद्वारे असेही आदेश देण्यात येत आहेत की, सामान्य प्रशासन विभागाच्या शासन परिपत्रक क्र.प्रानिमं-३०००/प्र.क्र.३८/२०००/१३-अ, दि. ३० ऑगस्ट, २००० द्वारे देण्यात आलेले आदेश रद्द समजण्यात यावेत.

५. या आदेशाच्या दिनांकास किंवा तत्पूर्वी भूतपूर्व निवड मंडळांकडील प्रलंबित संवर्गाबाबत न्यायालयाने काही आदेश दिले असल्यास न्यायालयाचे आदेश विचारात घेऊन प्रशासकीय विभागांनी योग्य ती कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(चारुशीला सोहोनी)
प्रधान सचिव (सेवा)
महाराष्ट्र शासन.

प्रति,
१. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर.
५. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८.* प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ न्याय शाखा, मुंबई,
९.* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई.
१०.* प्रबंधक, लोक आयुक्त / उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
११.* सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई,
१२.* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१३.* सचिव, राज्य निवडणूक आयोग,मुंबई.
१४. सर्व विभागीय आयुक्त
१५. सर्व जिल्हाधिकारी,
१६. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१७. सर्व मंत्रालयीन विभाग,
१८. सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख,
१९. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
२०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२१. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
२२. निवड नस्ती.

* पत्राने.

-xox-